**शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह चिखलदरा, जि. अमरावती या वसतीगृहाच्या दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवबां-२०१०/प्र.क्र.१६/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०१०.

**शासन निर्णय** : उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चिखलदरा यांनी शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह चिखलदरा, जि. अमरावती या वसतीगृहाच्या दुरुस्तीचे बाधकामाचे रुपये १,५५,५६०/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक व आराखडा प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर अंदाजपत्रक व आराखडा कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर, जि.अमरावती यांनी साक्षांकित केला आहे.

२. सदर अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे. तेव्हा शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह चिखलदरा, जि. अमरावती च्या दुरुस्तीच्या रुपये १,५५,५६०/- (अक्षरी रुपये एक लाख पंचावन्न हजार पाचशे साठ फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खाली दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| कामाचा तपशील | अंदाजित किंमत (रु.) |
|---|---|
| सदर वसतीगृहाच्या पहिल्या मजल्यावर वापरात नसलेल्या गच्चीच्या जागेत भोजन कक्षाचे बांधकाम करणे | १,५५,५६०/- |

३ सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० साठी मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००१२११५५१०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

२१।१।१०
( अ. क्रो. आहिरे )
**कक्ष अधिकारी**

**प्रति,**
महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती.
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चिखलदरा, जि. अमरावती
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी, जि. अमरावती
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चिखलदरा, जि. अमरावती
सह सचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६), मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)